**गृह विभागाच्या अधिपत्याखालील महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या अधिनस्त कार्यरत न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,मुंबई यांच्या आस्थापनेवरील संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, गट-अ या पदावर सरळसेवेने नियुक्ती देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एफएसएल-०४२३/प्र.क्र.१९०/पोल-४**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १९ जुलै, २०२३.

संदर्भ :-

१) उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई यांचे पत्र क्र.:एचएमआर-१६२२/प्र.क्र.९५/२०२२/२८, दि.२८.०४.२०२३
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी. ६७/ प्र.क्र.२०७/कार्या-१२, दि.२८.०५.२०१८.
३) शासन पत्र क्र. एफएसएल-०४२३/प्र.क्र.१९०/पोल-४, दि.१२.०७.२०२३

**प्रस्तावना :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या अधिनस्त संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, गट-अ (७ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी:- S-२८- १,२४,८००-२,१२,४००) या वेतनश्रेणीतील एकाकी पद निर्माण करण्यात आली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.२८.०४.२०२३ च्या सदर पदावर श्रीमती व्हावळ संगिता शशिकांत (लग्नानंतरचे नाव डॉ. संगिता विजय घुमटकर) यांची नियुक्तीसाठी शासनास शिफारस करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने श्रीमती व्हावळ यांची न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयातील परिविक्षाधीन संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय मुंबई, गट-अ या पदावर सदर शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीनुसार सरळसेवेने स्थानापन्न नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत शिफारस करण्यात आलेल्या श्रीमती व्हावळ संगिता शशिकांत (लग्नानंतरचे नाव डॉ. संगिता विजय घुमटकर) यांची परिविक्षाधीन संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई येथील गट-अ (७ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी:- S-२८- १,२४,८००-२,१२,४००) या वेतनश्रेणीतील पदावर खालील नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार नियुक्ती देण्यात येत आहे:-

१) उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८.०५.२०१८ च्या शासन निर्णयातील सूचनेप्रमाणे संबंधित उमेदवारांनी सदर आदेश प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, नविन प्रशासकीय इमारत, मुंबई येथे आवश्यक त्या सर्व मूळ कागदपत्रांसह हजर रहावे. अन्यथा, सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

२) श्रीमती व्हावळ संगिता शशिकांत यांची नियुक्ती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मुळ अर्ज क्र.३०३/२०२३ प्रकरणातील अंतिम आदेशाच्या अधीन राहील.

३) सदर उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी हा नियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या तारखेपासून २ वर्षाचा राहील. सदर कालावधीत परिवीक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास एखादा उमेदवार सक्षम नसल्याचे सिध्द झाल्यास अशा उमेदवाराची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मध्ये परिवीक्षा धोरणाबाबत नमूद केलेल्या अटी व शर्ती सदर उमेदवारांना लागू राहतील.

५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.०३.२००३ अन्वये संगणक हाताळणी /वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त मूळ प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून २ वर्षाच्या आत विभाग प्रमुखांकडे सादर करणे आवश्यक आहे.

६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चारित्र्य-२११७/प्र.क्र.४८३/२०१७/१६अ, दिनांक २८.०८.२०१७ नुसार उमेदवारांची चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल आणि महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम १५ नुसार वैद्यकीय तपासणी अहवाल आणि संदर्भ क्र.३ येथील शासन पत्रान्वये श्रीमती व्हावळ यंनी शासनास सादर केलेल्या शैक्षणिक अर्हता व अनुभव प्रमाणपत्रांची तपासणी/छाननी महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेस्तरावर करण्याच्या अधीन राहून श्रीमती व्हावळ संगिता शशिकांत यांना नियुक्ती देण्यात येत आहे. सदर अहवाल असमाधानकारक असल्याचे निदर्शनास आल्यास सदर नियुक्ती कोणतेही कारण न देता १ महिन्याची नोटीस देऊन समाप्त करण्यात येईल.

७) दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीत किंवा त्यानंतर शासनाने विहीत नियमानुसार वाढविलेला परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई गट-अ या संवर्गात नियमित नेमणूक केली जाईल.

८) सदर उमेदवार जर दोन वर्षाच्या कालावधीच्या आत किंवा वाढविलेल्या परिविक्षाधीन कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करु शकले नाहीत आणि/किंवा विहीत परीक्षा/चाचण्या उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणूकीबद्दल दोषी आढळले किंवा शासकीय सेवेत अभियोग्य नसतील तर अशा उमेदवाराची सेवा समाप्त करण्यात येईल.

९) नियमाप्रमाणे सदर उमेदवारांना विहीत मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल व सदर परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास शासन नियमानुसार योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

१०) उपरोक्त वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील गट-अ (राजपत्रित) च्या अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सेवाविषयक नियम सदर उमेदवाराला लागू होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र २०२३०७१९१७४९१४६१२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF80F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2023.07.19 17:51:09 +05'30'

**( सुधाकर यादव )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राद्वारे)
३. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय,मुंबई.
४. मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (गृह)/शहरे/ग्रामीण, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा,पुणे/कोल्हापूर/नाशिक /औरंगाबाद/ नांदेड/नागपूर/अमरावती.
९. उपसंचालक, लघु न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा ठाणे/रत्नागिरी/सोलापूर/धुळे /चंद्रपूर.
१०.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१२. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२/कार्या-१६ब),मंत्रालय,मुंबई.
१३. निवडनस्ती गृह विभाग/पोल-४
१४. श्रीमती व्हावळ संगिता शशिकांत (लग्नानंतरचे नाव डॉ. संगिता विजय घुमटकर), प्रभारी संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई